**डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांच्या महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या पदावरील प्रतिनियुक्तीच्या अटी / शर्ती विहित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उदयोग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांक : आस्था-२०१८/प्र.क्र.२२८/ऊर्जा-७**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०१८.

<u>वाचा</u> : १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एईओ-१०१८/प्र क्र ३३/२०१८/ दहा, दि. १९/४/२०१८

२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. भाप्रसे -३०९५/३००/९५/नऊ, दि.१८ एप्रिल, १९९६.

**<u>प्रस्तावना :</u>**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांची सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील आदेशान्वये महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, (महाऊर्जा) पुणे या पदावर प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आली आहे. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण या पदावरील पदस्थापना प्रतिनियुक्तीने असल्याने सदर पदाच्या प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्या अनुषंगाने शासन या आदेशाद्वारे, डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से यांच्या महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या प्रतिनियुक्तीच्या पदावरील सेवेच्या अटी / शर्ती पुढील प्रमाणे विहित करीत आहे.

**<u>शासन आदेश :-</u>**

डॉ विपिन शर्मा, भा. प्र. से. यांच्या महासंचालक, महाऊर्जा विकास अभिकरण, पुणे या पदावरील प्रतिनियुक्तीने नियुक्ती / पदस्थापना झाली असल्याने सदर पदाच्या प्रतिनियुक्तीच्या खालीलप्रमाणे अटी व शर्तीस शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. हे दिनांक १७ एप्रिल, २०१७ (म. पू.) पासून महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) या पदावर प्रतिनियुक्तीवर असतील.

अ) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना त्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे यांना नसेल तर ते त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकतात. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्याच्या कमीत कमी ३ महिने अगोदर महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांनी शासनास तसे कळविणे आवश्यक राहील.

**२) वेतन:**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. हे सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत महासंचालक (महाऊर्जा) हे पद धारण करतील. सदर कालावधीत ते भारतीय प्रशासन सेवेतील निवड श्रेणीतील Selection Grade, Pay Matrix मधील Level १३ (३) प्रमाणे मूळ वेतन १,३०,६००/- एवढे घेतील. त्यांच्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबतचे आदेश शासनाच्या सामान्य प्रशासन विभागाकडून निर्गमित करण्यात येतील. याबाबतच्या पत्रव्यवहाराची कार्यवाही महाऊर्जाकडून करण्यात येईल.

**३) महागाई भत्ता :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा अधिकाऱ्यांना वेळोवेळी ज्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल त्या दराने महागाई भत्ता अनुज्ञेय असेल.

**४) प्रतिनियुक्ती भत्ता :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांना प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. भाप्रसे-३०१३/३१२/२०१३/९ दि.११.०९.२०१३ अन्वये निर्गमित केलेल्या तरतुदीनुसार प्रतिनियुक्ती भत्ता देण्याबाबत आवश्यक कार्यवाही महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था करेल.

**५) स्थानिक पूरक भत्ता :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. हयांना राज्य शासनाच्या नियमांनुसार / आदेशानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्या प्रचलित दराने स्थानिक पूरक भत्ता अनुज्ञेय असेल.

**६) निवासस्थान किंवा त्याऐवजी घरभाडे भत्ता:**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. हयांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांच्या दर्जास अनुसरून निवासस्थान महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था देईल. तथापि, ती संस्था त्यांना योग्य असे निवासस्थान देवू शकत नसेल आणि त्यांच्या ताब्यात प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी शासकीय निवासस्थान असेल तर ते शासकीय निवासस्थान प्रतिनियुक्तीच्या कालावधीत आपल्या ताब्यात ठेवू शकतात. मात्र, प्रतिनियुक्तीवर गेल्याच्या दिनांकापासून पहिले ३ महिने त्यांना विहित सामान्य दराने व त्यानंतर लागू ठरणाऱ्या

प्रचलित दराने शासकीय निवासस्थानाचे अनुज्ञप्ती शुक्ल व सेवाशुल्क भरणे आवश्यक राहिल. महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांच्या नियमांनुसार त्यांना भाडेरहित तत्वावर निवासस्थान देय असेल तर त्याचा लाभ डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांना घेता येईल.

प्रतिनियुक्तीच्या सदर कालावधीत त्यांच्या ताब्यात शासकीय किंवा वरील संस्था यांचे निवासस्थान नसेल तरच त्यांना सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.भाप्रसे-१००८/ प्र.क्र.२६२/०८/९, दिनांक २५.०२.२०१० नुसार तसेच त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या बदलानुसार प्रचलित दराने घरभाडे भत्ता अनुज्ञेय असेल.

**७) पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांना त्यांची स्वीयेत्तर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर, अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये, त्यांचे वेतन व प्रवासभत्ता, डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से हे ज्या शासनाच्या सेवेत असताना स्वीयेत्तर सेवेत गेले असतील ते शासन किंवा स्वीयेत्तर सेवेतून परत आल्यानंतर ज्या शासनाच्या सेवेत जाणार असतील ते शासन, त्यांच्या संबंधित नियमानुसार महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे अदा करेल.

**८) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरिता प्रवासभत्ता :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांना स्वीयेत्तर सेवेत रुजू झाल्यानंतर कर्तव्यार्थ कराव्या लागणा-या प्रवासांकरिता राज्य शासनाच्या संबंधीत नियमान्वये किंवा या संस्थेच्या नियमान्वये यापैकी ज्यांचे नियम अधिक फायदेशीर असतील त्या नियमानुसार प्रचलित दराने प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल.

**९) रजा :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (रजा) नियम, १९५५ हे नियम लागू असतील. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्यांना नैमित्तीक रजे व्यतिरिक्त इतर रजा मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग, का-१०) सक्षम असेल. स्वीयेत्तर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा व कोणत्याही स्थानिक पूरक भत्यावरील संपूर्ण खर्च महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांचेकडून करण्यात येईल.

**१०) विकलांगता रजेबद्दल रजा वेतन :**

स्वीयेत्तर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल मंजूर करण्यात येणाऱ्या रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेत्तर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुध्दा रजा वेतन देण्यास महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था जबाबदार

असेल. अशा रजा वेतनाचा खर्च महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांच्याकडून वसूल करण्यात येईल.

**११) रजा वेतन व निवृत्तीवेतन अंशदाने :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांच्याबाबत रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान हे शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक भाप्रसे-२००९/प्र.क्र.७०/२००९/९-अ, दिनांक २६.०२.२०१० व शासन शुध्दीपत्रक,सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक भाप्रसे - १००९/प्र.क्र.७०/२००९/९-अ, दिनांक २०.०३.२०१० मधील तरतुदीनुसार, शासनाने विहित केलेल्या दराने महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था शासनाकडे (सामान्य प्रशासन विभाग/का.९-अ) प्रत्येक आर्थिक वर्षाच्या समाप्तीपासून १५ दिवसांच्या आत किंवा जर स्वीयेत्तर सेवा आर्थिक वर्ष संपण्यापूर्वी समाप्त झाली असेल तर स्वीयेत्तर सेवा समाप्तीनंतर भरणा करील. हया रकमा दोन वेगवेगळया डिमांड ड्राफ्टव्दारे (पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा ) सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग /का.९-अ, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे आवश्यक असेल. सदर डिमांड ड्राफ्ट पुणे येथील कोणत्याही अनुसूचित बँकेचे व सहाय्यक संचालक (लेखा) सामान्य प्रशासन विभाग /का.९-अ, मंत्रालय, मुंबई या नांवे काढलेले असणे आवश्यक आहे. सदर रकमा पुढील लेखाशिर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

**अ)** **रजा वेतन :** "००७० तर प्रशासकीय सेवा-६० इतर सेवा-८००-इतर जमा रकमा (नऊ) अखिल भारतीय सेवेतील जे अधिकारी स्वीयोत्तर सेवेत प्रतिनियुक्तीवर आहेत त्यांच्याबाबत रजावेतन अंशदान (००७००११६) ".

**ब)** **निवृत्तीवेतन अंशदान :** "००७१-निवृत्तीवेतन व इतर सेवानिवृत्त लाभ यांच्या वसूलीसंबंधातील अंशदाने वसूलीच्या रकमा-०१-नागरी -१०१-अभिदाने अंशदाने (एक ) स्वीयेत्तर सेवा अधिकारी (००७१००१२)".

**टिप -** प्रतिनियुक्तीच्या कालावधीतील उपरोक्त रकमांचा भरणा करण्यास विलंब झाल्यास अशा प्रकरणी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे हया संस्थेची विलंब कालावधीतील दंडात्मक व्याज भरण्याची जबाबदारी राहिल.

**१२)** **नैमित्तिक रजा :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत राज्य शासनाच्या नियमानुसारच नैमित्तीक रजा उपभोगता येईल. प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमित्तिक रजा मंजूर करण्यास संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग सक्षम असेल.

**१३ ) रजा प्रवास सवलत :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. यांना अखिल भारतील सेवा (रजा प्रवास सवलत) नियम १९७५ मधील तरतुदीनुसार रजा प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल याबाबतचा खर्च महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा) पुणे या संस्थेस सोसावा लागेल. त्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत नैमितीक रजा वगळता इतर रजा कालावधीतील रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास शासन (सा.प्र.वि./का.१०) सक्षम असेल. (शासन परिपत्रक सा.प्र.वि.भाप्रसे-२०१५/७४/२००५/९ दि. ०६.१२.२००५)

तसेच नैमित्तीक रजेच्या कालावधीतील त्यांना व त्यांच्या कुटुंबातील सदस्यांना रजा प्रवास सवलत मंजूर करण्यास प्रशासकीय विभाग (ऊर्जा विभाग) सक्षम असेल.

**१४ ) रजेचे रोखीकरण :**

डॉ. विपिन शर्मा, भा. प्र. से. हयांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.आयएएस -१२७०/४४३०/दहा, दिनांक ०७.१२.१९६७ अन्ये निर्गमित केलेल्या आणि त्यानंतर वेळोवेळी सुधारीत केलेल्या आदेशानुसार अर्जित रजेच्या रोखीकरणचा लाभ घेता येईल. रजा वेतनावर प्रदत्त असणा-या पूरक भत्यांच्या व महागाई भत्यांचा सर्व खर्च देण्याची जबाबदारी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांची राहिल.

**१५) वैद्यकीय सवलत :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना आखिल भारतीय सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९५४ मधील तरतुदीनुसार वैद्यकीय सुविधांचा लाभ अनुज्ञेय असेल. याबाबतचा खर्च महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या संस्थेस सोसावा लागेल. मात्र सदर संस्थेचे त्यांच्या कर्मचाऱ्यांसाठी वैद्यकीय सवलती देण्याबाबत वेगळे नियम असतील आणि त्याचा लाभ ते घेऊ इच्छित असतील तर प्रतिनियुक्ती कालावधीत त्या नियमांचा लाभ घेण्याबाबत विकल्प देण्याचे स्वातंत्र्य त्यांना असेल. (शा.नि.सा.आ.वि. २००५/९/१/आ.३ दि.१९.०३.२००५ व शा. नि.सा.आ.वि. २०११/३३३/११/राकावि-२ दि. १६.११.२०११)

**१६) भविष्य निर्वाह निधी :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत अखिल भारतीय सेवा (भविष्य निर्वाह निधी) नियम १९५५ मधील तरतुदीनुसार, किंवा नवीन अंशदायी निवृत्ती वेतन योजना,यापैकी जी योजना लागू असेल, त्याचप्रमाणे वेळोवेळी शासनाने (सामान्य प्रशासन विभागाने) निर्गमित केलेल्या निर्देशाप्रमाणे कार्यवाही करण्याची जबाबदारी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या संस्थेची राहिल.

**१७) विभागीय चौकशी :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांच्या विरुद्ध विभागीय चौकशीबाबत अखिल भारतीय सेवा (शिस्त व अपील) नियम, १९६९ हे नियम लागू असतील, प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांच्याविरुद्ध विभागीय चौकशी करावयाची असल्यास त्यांना शासनसेवेत प्रत्यावर्तीत करण्यात येईल. यासंबंधी कारवाई अंतर्गत त्यांना शासनाने निलंबित केल्यास निलंबनाधीन कालावधीत त्यांना शासन निर्वाह भत्ता देईल. मात्र निर्वाह भत्त्याची रक्कम महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या संस्थेकडून वसूल करण्यात येईल.

**१८) बोनस किंवा सानुग्रह अनुदान :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना बोनस किंवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय नाही. महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ह्या संस्थेच्या नियमानुसार जरी त्यांना बोनस अथवा सानुग्रह अनुदान अनुज्ञेय असले तरी त्यांना ते स्विकारता येणार नाही.

**१९) गटविमा योजना :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना वेतनातुन दरमहा रु. १२० /- इतकी रक्कम केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था दरमहा वसूल करील. ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयमा)-१, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल. या रक्कम वसुलीचे विवरणपत्र सहाय्यक संचालक, सामान्य प्रशासन विभाग/९-अ, मंत्रालय यांच्याकडे पाठवेल.

(केंद्र शासकीय कर्मचारी गटविमा सदस्यांबाबत) (८६५८-सस्पेन्स अकाऊंटस-१२३ ऑल इंडिया सर्व्हिसेस ऑफिसर्स ग्रुप इन्शुरन्स स्कीम-रिकव्हरीज टुवर्डस, सेंट्रल गव्हर्नमेंट एम्प्लॉईज ग्रुप इन्शुरन्स स्कीम मेड ॲप्लीकेबल टू आयएएस ऑफिसर्स बॉर्न ऑन दि महाराष्ट्र केडर-सबस्क्रीप्शन आयएएस (८६५८-८६२-८) या शीर्षाखाली दर्शविण्यात यावी.

सदर वर्गणी भरण्यास विलंब झाल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याजाची आकरणी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांच्याकडून करण्यात येईल.

**२०) मोटार कार :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीत वापरासाठी महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था वाहन उपलब्ध करुन देईल. सदर वाहनांचा खाजगी वापर खालील अटींच्या अधीनतेने त्यांना करता येईल.

अ) वाहनाचा खाजगी वापर दरमहा २५० किलामीटरहून अधिक होता कामा नये. यासाठी त्यांनी वेळोवेळी विहित करण्यात येणा-या दराने भाडे संस्थेस द्यावे लागेल.

ब) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. टीआरए-१०९०/सीआर-३२०/९०/एसईआर-५, दि. १७/१२/१९९० अन्वये निर्गमित केलेल्या आदेशानुसार वाहनाच्या खाजगी वापरास परवानगी असेल. मात्र संबंधित आदेशात वेळोवेळी ज्या सुधारणा केल्या जातील त्या सुधारणाही वाहनाच्या खाजगी वापराबाबत आपोआप लागू असतील.

**२१) कर्ज आणि अग्रिम :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत घरबांधणी अग्रीम, मोटारकार अग्रीम, वैयक्तीक संगणक अग्रीम मंजूर करण्यास शासन (सामान्य प्रशासन विभाग) सक्षम असेल. याबाबतचे त्यांचे अर्ज सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, का. ९, मुंबई यांच्याकडे मंजुरीसाठी पाठविण्यात यावे. महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांनी त्यांना सदर अग्रीम मंजूर करु नये.

जर डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांना महाराष्ट्र शासनाकडून यापूर्वीच घर बांधणी अग्रीम मंजूर करण्यात आले असेल आणि त्याच्या व्याजाची वसुली सुरु असेल तेंव्हा महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या संस्थेने त्यांच्या वेतनातून ती वसुली करुन त्या रकमा वेगवेगळया धनादेशाद्वारे महाराष्ट्र कोषगार नियमातील नमुना क्र. ५५ मध्ये माहिती भरुन त्या नमुन्यासह पुढील महिन्यात सहाय्यक संचालक (लेखा), ९-अ मंत्रालय, मुंबई यांच्याकडे पाठवावी. धनादेश सहाय्यक संचालक (लेखा), सामान्य प्रशासन विभाग, ९-अ या नावाने काढण्यात यावा.

**२२) प्रतिनियुक्तीवर असताना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. हे प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेले किंवा प्रशिक्षणासाठी गेले आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिका-यांची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवर अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजा वेतन, वेतने, पदग्रहण अवधी सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च, रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करेपर्यंतच्या दिनांकापर्यंत महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे ही संस्था सोसेल.

**२३) निवासी शिपायाऐवजी रोख परतावा :**

महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांच्या निवासस्थानी शिपाई दिला नसल्यास व डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायाऐवजी रोख परतावा अनुज्ञेय असल्यास किंवा महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे या संस्थेतील अधिकाऱ्यांना निवासी शिपायाऐवजी रोख परतावा अनुज्ञेय असल्यास त्यांना प्रतिनियुक्तीच्या

कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल. मात्र असा परतावा घेण्यापूर्वी संबंधित अधिका-याच्या निवासस्थानी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र दरमहा संबंधित अधिका-यांना देणे आवश्यक राहील.

**२४) शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे :**

डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. ह्यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम / कार्यकारी आदेश लागू असतील.

**२५) प्रतिनियुक्ती कालावधीत देशात / परदेशात प्रवास :**

महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे येथें प्रतिनियुक्तीवर असताना, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही. मात्र महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (महाऊर्जा), पुणे यांच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, अथवा खाजगी कामांसाठी पदरेशी जावयाचे असल्यास शासनाची पूर्वपरवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे संस्थेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय / निमशासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशातर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

**२६) विहित अटी व शर्तींमध्ये समाविष्ट नसलेल्या अटी / शर्तीबाबत :**

वर नमूद केलेल्या अटी / शर्तीमध्ये समाविष्ट नसलेल्या विशिष्ट अटी / शर्तीबाबत महाराष्ट्र शासन, संवर्गातील भारतीय प्रशासन सेवा अधिका-यांना जे नियम, विनियम आणि कार्यकारी आदेश लागू असतील ते नियम, विनियम व कार्यकारी आदेश डॉ. विपिन शर्मा, भा.प्र.से. यांना सुध्दा लागू असतील.

२. सदर शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ९५/२०१८ का १० दिनांक १६/५/२०१८ व क्र. २९/२०१८/का.९ दि.१७/५/२०१८ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६४/१८ सेवा-६ दि. ५/६/२०१८ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८०६२११४४९१४९११० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Prashant
Pundalik
Badgeri

Digitally signed by Prashant Pundalik Badgeri
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ae61ab0caff4e0f24ac492ed7902d55ccf49e93124a5c1327133a6da9db8c748, serialNumber=ec955e2d360e1fddb6abac58a907419053beeceb5dbac48a78c89c588ff71bef, cn=Prashant Pundalik Badgeri
Date: 2018.06.21 14:48:26 +05'30'

**(प्र. पुं. बडगेरी)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, ( लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा),मुंबई- ४०० ००१
२. महालेखापाल, महाराष्ट्र-२,( लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा),नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, पुणे म्हाडा कमर्शियल कॅाम्प्लेक्स, सर्व्हे नं फेज. १९१-ए-, येरवडा, पुणे- ४११ ००६.
७. (प्रशासन/रोख) अवर सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई. ३२
८. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय,मुंबई. ३२
९. निवड नस्ती-ऊर्जा-७.